३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा खर्चास
प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र .संकीर्ण ८२२३/ प्र.क्र. ३९१ (भाग १) (अ) /सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ३१ मे, २०२३

संदर्भ :- १) शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण ८२२३/ प्र.क्र. ३०४ /सां.का.४ दिनांक ११ मे,२०२३
२) जिल्हाधिकारी व जिल्हादंडाधिकारी कार्यालय, रायगड -अलीबाग यांचे क्रमांक सामान्य प्रशासन/कार्या-ब४/३५०वा राज्या. सोहळा/अनु. मागणी/ २०२३ दिनांक २७ मे,२०२३
३) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. सांकासं/ ३१७३, दि. २९ मे, २०२३.

**प्रस्तावना :**

"३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा" या महोत्सवाच्या निमित्ताने किल्ले रायगड व पाचाड येथे विविध कार्यक्रम/उपक्रमांचे आयोजन करण्यास उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी, रायगड यांना प्राधिकृत करण्यात आले आहे. तसेच, आयोजित होणाऱ्या सांस्कृतिक कार्यक्रमांशी निगडीत खर्चाची मागणी जिल्हाधिकारी यांनी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्यामार्फत करण्याचेही शासनाने जिल्हाधिकारी, रायगड यांना निर्देशित केले आहे. त्यानुषंगाने, "३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा २०२३" च्या औचित्यावर आयोजित करावयाच्या सांस्कृतिक कार्यक्रमाशी निगडीत बाबींवर होणाऱ्या, उपर्निर्दिष्ट २ व ३ अन्वये शासनास सादर झालेल्या, प्रस्तावित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

दिनांक ०१ जून, २०२३ ते ०७ जून, २०२३ या कालावधीत मौजे किल्ले रायगड येथे व पाचाड येथे "३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा" या महोत्सवाच्या निमित्ताने आयोजित करावयाच्या सांस्कृतिक कार्यक्रमाशी निगडीत खालील तक्त्यात नमूद अंदाजित खर्च रुपये ४,७७,५२,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी सत्त्याहत्तर लाख बावन्न हजार फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**३५० वा शिवराज्याभिषेक सोहळा अंतर्गत कार्यक्रमाच्या खर्चाचा तपशील खालील प्रमाणे :-**

| अ.क्र. | कार्यान्वयीन यंत्रणा | कामाचे नांव | रक्कम (रु. लाख) |
|---|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता, रायगड विद्युत विभाग, सां.बा.विभाग, पेण | दि. १ जून ते ७ जून, २०२३ या कालावधीत संपन्न होणाऱ्या ३५० वा शिवराज्याभिषेक सोहळ्याकरिता विविध विद्युत विषयक व्यवस्थेकरीता | **४७७.५२** |

०२. सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, मुख्य लेखाशिर्ष २२०५, कला व संस्कृती, (१०२) कला व संस्कृती, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सवांतर्गत कार्यक्रम, (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. उपरोक्त बाबतची कार्यवाही शासनाच्या विहित पध्दतीनुसार करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी रायगड यांची राहील. तसेच, शासनाने रुपये ४७७.५२ लक्ष इतक्या ढोबळ तपशिलातील खर्चास प्रशासकीय मान्यता दिली असली तरी, जिल्हाधिकारी रायगड यांनी प्रत्यक्ष सांस्कृतिक कार्यक्रमांसाठींच्या आवश्यक बाबींची खात्री करुनच कार्यादेश देण्याची कार्यवाही करावी.

०४. उपरोक्त कार्यक्रमासाठी होणाऱ्या तपशीलवार खर्चाची देयके जिल्हाधिकारी रायगड यांनी प्रमाणित करुन संचालक सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत वित्तीय मान्यता घेण्यासाठी शासनास कार्यक्रम संपन्न झाल्यानंतर १५ दिवसांच्या आत सादर करणे आवश्यक राहील.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०५३११३३११५३४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASAD MAHADEV MAHAJAN

Digitally signed by PRASAD MAHADEV MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=6fcffe7574d536c6e270856345547bb470a3e70655baa82e214fc4d0cfaccaed, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B8EA3F1827AABAFA30CAEC97C98F4C9643851C3A32CFA11A13F635FC0BEA0AC3, cn=PRASAD MAHADEV MAHAJAN
Date: 2023.05.31 17:36:54 +05'30'

**( प्रसाद म. महाजन )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री तथा अध्यक्ष धोरण समिती यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री तथा उपाध्यक्ष धोरण समिती यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) तथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सामाजिक न्याय, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री, कौशल्य विकास, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मंत्री, आरोग्य, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. मंत्री, पर्यटन, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा. मंत्री, ग्रामविकास, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. मा. मंत्री, महिला व बालविकास, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. मा. मंत्री, क्रीडा, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. मा. मंत्री, शालेय शिक्षण, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण, तथा सदस्य कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

१४.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.विभागीय आयुक्त, कोकण विभाग
१८. जिल्हाधिकारी, रायगड
१९.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी गोरेगाव मुंबई.
२०.उप सचिव ( सां.का.४ व अर्थसंकल्प ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय,
२१.संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई
२२.कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
२३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२५.महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
२६.महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
२७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
२८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
२९. निवड नस्ती, सां.का.४.